आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत आदिवासी क्षेत्रात एस.टी. डेपोचे विकास, बांधकाम, दुरुस्ती या योजनेअंतर्गत सन २०२१-२२ करीता निधी वितरण.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्र. एसटीसी-०१२१/प्र.क्र.०४/परि-१

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २४ फेब्रुवारी, २०२२.

वाचा :-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१.
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२१/प्र.क्र.०९(भाग-१)/का-६, दि.१७.०२.२०२२.
३) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.राप/स्थाअ/कामे/२८७२, दि.२७.०९.२०२१.
४) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.राप/कामे/स्थाअ/१४८, दि.२१.०१.२०२२.

शासन निर्णय :-

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ आर्थिक वर्षाकरीता आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत आदिवासी क्षेत्रातील राज्य परिवहन महामंडळाच्या बसस्थानकांचे आधुनिकीकरण या योजनेअंतर्गत मागणी क्र.टी-५, ३०५५, मार्ग परिवहन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ००-मार्ग परिवहन, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (०१) आदिवासी क्षेत्रात एस.टी.डेपोचे विकास, बांधकाम, दुरुस्ती (३०५५ ००४३), ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाखाली सन २०२१-२२ मध्ये रु.१५००.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत आहे.

त्यानुषंगाने आदिवासी विकास विभागाने (३०५५ ००४३), ३१- सहाय्यक अनुदाने या बाबीखाली गडचिरोली येथे चालक प्रशिक्षण केंद्र विभागीय कार्यालयासह बांधणे रु.२८०.४६ लाख व पांढरकवडा चालक प्रशिक्षण केंद्राचे नुतनीकरण रु.१५८.३१ लाख असे एकूण रु.४३८.७७ लाख इतका निधी (रुपये चार कोटी अडतीस लाख सत्याहत्तर हजार फक्त ) प्रशासकीय विभाग म्हणून अपर मुख्य सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास संदर्भाधिन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये मंजूरी प्रदान केली आहे.

२. वरीलप्रमाणे निधी वितरीत करण्यासाठी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रक्कम आहरित करुन महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ यांना अदा करण्याची कार्यवाही करावी.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरित करण्यात आला आहे. प्रकरणी विभागप्रमुख/नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधिन क्र.१ येथील शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४.     सदर उपलब्ध करून दिलेल्या तरतूदीतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल लेखाशिर्षनिहाय /उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५.     नियंत्रक अधिकारी व विभाग प्रमुख यांनी सदरचा खर्च आदिवासी उपयोजना क्षेत्रातच नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी.

६.     हा शासन निर्णय आदिवासी विकास विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३८/का-६, दि.१०.०२.२०२२ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७.     सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२२४१३३६००७७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MINAKSHI DEVIDAS KARHADE

Digitally signed by MINAKSHI DEVIDAS KARHADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT(TRANSPORT), postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0ea81113f6df694c04d4b835d0f3328844e438498d9d1d7bcfcc2bf1f5abf98a, pseudonym=3ECC0123EF2E9557142DB57330C5E392065C2897, serialNumber=64757C0F2E9C5E56362BC8E7A79ABEE993C28EBD3D21BC22D37A4D8E12AD1CB3, cn=MINAKSHI DEVIDAS KARHADE
Date: 2022.02.24 13:37:43 +05'30'

**(मिनाक्षी कऱ्हाडे)**
कार्यासन अधिकारी, गृह (परिवहन) विभाग

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (परिवहन), गृह (परिवहन) विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
४. महाव्यवस्थापक (बांधकाम), महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
५. वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ,मुंबई.
६. आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
९. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
१०.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
११.महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई.
१२.संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, मुंबई.
१३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४.निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१५.वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-१०/अर्थोपाय/साऊ/विनियम), मंत्रालय, मुंबई.
१६. गृह विभाग (बीयुडी-१/बीयुडी-२/परिवहन-४), मंत्रालय, मुंबई.
१७. निवड नस्ती/कार्यासन परि-१.